जळगांव जिल्हा कारागृहातील स्वयंपाकगृहाचे विस्तारीकरण व फेरबदल करण्यास प्रशासकीय मान्यता देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी-३२९७/१[९८]/बीआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ३ नोव्हेंबर १९९८.

वाचा:- १] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी-२६९७/२२९५१/कक्ष-३, दिनांक ७. ८. १९९७.

२] वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-विअप्र-१०९२/प्र. क्र. ११३/९२/विनिमय दिनांक १ जून १९९२.

शासन निर्णय:- जळगांव जिल्हा कारागृह येथील सध्या अस्तित्वात असलेले स्वयंपाकगृह हे अत्यंत लहान, अपुरे, व गैरसोईचे आहे. या कारागृहाची बंदी ठेवण्याच्या क्षमतेपेक्षा जास्त बंदी ठेवावे लागत असल्यामुळे सध्याचे स्वयंपाकगृह अपुरे पडत आहे. तसेच स्वयंपाकगृहाशी जागा अपुरी असल्यामुळे तेथे स्वयंपाकासाठी डिझेल बर्नर बसविणेसुध्दा अडचणीचे आहे. अशा परिस्थितीत स्वयंपाकगृहाचे विस्तारीकरण व फेरबदल करण्यासाठी शासनाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता द्यावी अशा प्रकारची कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास विनंती केली असून हा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. जळगांव जिल्हा कारागृहातील स्वयंपाकगृहाचे विस्तारीकरण व फेरबदल करण्यासाठी कारागृह महानिरीक्षक यांनी रु. २,३६,८००/- [दोन लक्ष छत्तीस हजार आठशे] इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक योग्य समर्थनासह शासनास मान्यतेसाठी सादर केले असून वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-विअप्र-१०९२/प्र. क्र. ११३/९२/विनिमय दिनांक १. ६. ९२ अन्वये व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग, पहिला उप विभाग, पाच अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करुन सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च हा मागणी क्र. बी-७-मुख्य लेखाशीर्ष-२०५६-तुरुंग-१०१ तुरुंग १०१ [३६] जिल्हा कारागृहे गौण बांधकामे या उप लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा. तसेच सदरचा खर्च सन १९९८-९९ च्या पूरक मागणी अनुदानातून भागविण्यात यावा. यास प्रशासकीय मान्यता दिलेली असली तरी प्रत्यक्ष निधीची तरतूद व उपलब्धता झाल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये. स्वयंपाकगृहाचे विस्तारीकरण व फेरबदल हे मंजूर केलेल्या अनुदानातूनच पूर्ण होणे आवश्यक आहे. त्यासाठी पुन्हा अतिरिक्त अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

सदर शासन निर्णय हा शासन निर्णय, क्रमांक-अप-१०९२/प्र.क्र. ११३/९२ विनियम, दि. १. ६. १९९२ अन्वये वित्त विभागाने प्रदान केलेल्या शक्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ता. स. नाईक ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक [मुख्यालय] महाराष्ट्र राज्य, पुणे.
अधिक्षक, जळगांव जिल्हा कारागृह, जळगांव.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर [लेखा व अनुज्ञेयता] नागपूर.
महालेखपाल, महाराष्ट्र-२, नागपूर [लेखा परिक्षा] नागपूर.
कोषागार अधिकारी, जिल्हा जळगांव.
वित्त विभाग [व्यय-८] मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग [का. १४५५] मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग [इमा-२, अर्थ-२] मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, कार्यासन क्र. बीयुडी-१.
निवडनस्ती [ पोआरएस-२]